**महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या कार्यालयातील**
**गट-अ,गट-ब संवर्गात तसेच तांत्रिक**
**संवर्गातील पदे नव्याने निर्माण करण्याबाबत**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन निर्णय : क्र.मलोआ-१००८/२६६/प्र.क्र.८८/०८/आठ**
**मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.**
**दिनांक : १७ ऑगस्ट, २०१०**

**प्रस्तावना :-** महाराष्ट्र लोकसेवा आयोगाला शासन निर्णय क्र.मलोआ-१००५/८८८/प्र.क्र.५८/०५/आठ, दि.५.१०.२००६ अन्वये २३५ पदांचा सुधारित आकृतिबंध मंजूर करण्यात आला आहे. आयोगाच्या परिक्षार्थींमध्ये झालेली प्रचंड वाढ, महाराष्ट्र लोकसेवा आयोगाकडून घेण्यात येणाऱ्या विविध परीक्षा यामुळे महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या कामकाजात मोठ्या प्रमाणात वाढ झाली असून त्याप्रमाणामध्ये कर्मचारीवृंद हा अपुरा असल्याचे महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने शासनाच्या निदर्शनास आणले आहे. महाराष्ट्र लोकसेवा आयोगाकडून घेतल्या जाणाऱ्या स्पर्धा परीक्षेच्या प्रत्येक पातळीवर कर्मचाऱ्यांची आवश्यकता असते. पूर्व परीक्षा, मुख्य परीक्षा, शारीरिक चाचणी परीक्षा, मुलाखतीचे दौरे, यासारखे कामकाज वेळेवर व योग्य प्रकारे पार पाडण्यासाठी महाराष्ट्र लोकसेवा आयोगाला सध्या मंजूर करण्यात आलेला कर्मचारीवृंद पुरेसा नसल्यामुळे महाराष्ट्र लोकसेवा आयोगाचे कामकाज सुरळीत चालावे यासाठी महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने अतिरिक्त पदांची आवश्यकता शासनास कळविली होती.

त्याचप्रमाणे महाराष्ट्र लोकसेवा आयोगाचे संगणकीकरणाचे काम प्रगतीपथावर असून त्यासाठी महाराष्ट्र लोकसेवा आयोगास सिस्टीम ॲनालिस्ट, प्रोग्रॅमर व डाटा एन्ट्री ऑपरेटर यासारखी तांत्रिक पदे उपलब्ध करुन देण्याचे देखिल महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने प्रस्तावित केले होते. त्यानुसार महाराष्ट्र लोकसेवा आयोगास अतिरिक्त पदे मंजूर करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :-** महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने शासनाच्या निदर्शनास आणलेल्या वरील बाबींचा साकल्याने विचार करुन महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या कामकाजात गतिमानता यावी यासाठी आता महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या कार्यालयाच्या आस्थापनेवर खाली नमूद केल्यानुसार विविध संवर्गांतील एकूण ४४ पदे नव्याने निर्माण करण्यास शासन मंजूरी देत आहे.

कृ.मा.प.

| अ.क्र. | नव निर्मित पदाचे पदनाम | वेतनश्रेणी | प्रस्तावित नवनिर्मित पदांची संख्या |
|---|---|---|---|
| १ | उप सचिव | १५६००-३९१००+६६०० ग्रे.पे. | १ |
| २ | अवर सचिव | १५६००-३९१००+५००० ग्रे.पे. | ४ |
| ३ | अधीक्षक | ९३००-३४८०० + ४४०० ग्रे.पे. | १० |
| ४ | लघुलेखक उच्चश्रेणी | ९३००-३४८०० + ४४०० ग्रे.पे. | ३ |
| ५ | सहायक | ९३००-३४८०० + ४४०० ग्रे.पे. | २० |
| ६ | सिस्टीम ॲनालिस्ट | ९३००-३४८०० + ५००० ग्रे.पे. | १ |
| ७ | प्रोग्रॅमर | ९३००-३४८०० + ४३०० ग्रे.पे. | २ |
| ८ | डाटा एन्ट्री ऑपरेटर | ९३००-३४८०० + ४२०० ग्रे.पे. | ३ |
| | | **एकूण** | ४४ |

वरील नवीन पदनिर्मितीमुळे होणारा वाढीव खर्च महाराष्ट्र लोकसेवा आयोगास मंजूर असलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

हा शासन निर्णय वित्त विभागाच्या सहमतीने व त्यांचा अनौपचारिक संदर्भ क्र.३२५/विसु-१, दि. १७/८/२०१० नुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय, महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २०१००८१७१८४१३५००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

17.8.10

**( के.पी.बक्षी )**
**प्रधान सचिव(सेवा)**
**सामान्य प्रशासन विभाग**

**प्रति,**

१. मा.मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव
२. मा.राज्यमंत्री (सा.प्र.) यांचे खाजगी सचिव
३. मुख्य सचिवांचे स्वीय सहायक
४. प्रधान सचिव (नियोजन), प्रधान सचिव (वित्त) यांचे स्वीय सहायक
५. महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई
६. महालेखापाल-१ (लेखा परीक्षा), महाराष्ट्र, मुंबई
*७. सचिव, मा.राज्यपालांचे सचिवालय, राजभवन, मुंबई
८. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई
*९. सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग
१०. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
११. वित्त विभाग (बीयुडी-१४, व्यय-४, वित्तीय सुधारणा), मंत्रालय, मुंबई
१२. सामान्य प्रशासन विभाग, कार्यासन-२५,
१३. सामान्य प्रशासन विभागातील सर्व कार्यासने
१४. निवडनस्ती (कार्यासन क्र.आठ)